राज्यातील कारागृह प्रशासनाचे संगणकीकरण
प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन परिपत्रक क्र.एमआयएस/२००३/प्र. क्रं. १४४/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक - २८ फेब्रुवारी २००५.

वाचा : १) कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रं. संगणकीकरण/१९९८/कक्ष-१ दि. ११.६.०३
२) सार्वजनिक जनहित याचिका क्र.३८६/२००४ व इतर संदर्भात दिनांक २-१२-२००४ च्या आदेशाची प्रत.

प्रस्तावना :

राज्यातील कारागृहामध्ये बंद्यांची संख्या मंजूर क्षमतेपेक्षा अधिक आहे. तसेच जवळ जवळ कारागृहातील एकूण बंद्यांच्या २/३ कच्चे कैदी आहेत व त्यांना वारंवार न्यायालयात वेळोवेळी हजर करावे लागते. तसेच शिक्षा बंद्यांचे मुदतपूर्व सुटकेचे प्रस्ताव विहित वेळेत सादरीकरण करून त्यास विहित वेळेत शासनाची मान्यता मिळविणे अत्यंत आवश्यक असते. या व्यतिरिक्त राज्यात विविध ठिकाणी असलेल्या कारागृहातील सोयीसुविधा, दैनंदिन प्रशासनावर होणारा खर्च व कैद्यांच्या संदर्भातील न्याय प्रक्रियेचे टप्पे वेळेवर पूर्ण करण्याची दक्षता घेणे आणि कारागृह प्रशासन अतिशय पारदर्शक व कार्यक्षमतेने चालविण्यासाठी कारागृहाच्या प्रशासनाच्या संगणकीकरणाचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन आहे. कारागृह महानिरीक्षक. महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी यापूर्वी कारागृह प्रशासनाच्या संगणकीकरणाचा प्रस्ताव शासनाकडे सादर केला होता व तो शासनाच्या विचाराधीन आहे.

वर नमूद केलेल्या परिस्थितीत संगणकीकरणाचा प्रकल्प तयार करणे व राबविणे शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. सीओएम/१००१/प्रक्र-१७४/०१/३१,दिनांक २९-१०-२००१ मधील परिच्छेद ७.० अन्वये प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करणे अत्यंत आवश्यक आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | प्रधान सचिव (तुरुंग) | - | अध्यक्ष |
| २) | सचिव (माहिती व तंत्रज्ञान) | - | सदस्य |
| ३) | अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे प्रतिनिधी. | - | सदस्य |

.......२

| | | | |
|---|---|---|---|
| ४) | सचिव (वित्त) | - | सदस्य |
| ५) | कारागृह महानिरीक्षक | - | सदस्य सचिव |

या समितीकडे कारागृह प्रशासनाच्या संगणकीकरणाच्या प्रकल्पासाठी तंत्र सल्लागार नेमणे, निविदा मागविणे, निविदा अंतिम करणे, प्रकल्प अंमलबजावणीचे आदेश काढणे, वर्कऑर्डर देणे आणि प्रकल्प सर्वार्थाने पूर्ण झाल्यानंतर कारागृह महानिरीक्षक यांना हस्तांतरीत करणे याबाबतची सर्व कामे सदर समितीच्या कार्यकक्षेत येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

आ.ग.परदेशी

( आ. ग. परदेशी )

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.

अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.

अपर मुख्य सचिव ,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.

प्रधान सचिव (तुरुंग) गृह विभाग, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.

प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान) सामान्य प्रशासन विभाग, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.

सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.

कारागृह महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य, पुणे

कारागृह उपमहानिरीक्षक , दक्षिण विभाग, मुंबई

सह सचिव, पोल-४, मंत्रालय, मुंबई

निवड नस्ती पीआरएस-२